# महाराष्ट्र शासन
## सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः बीजीटी २०२१/प्र.क्र.९६/अर्थसंकल्प (विघयो),

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय विस्तार भवन,
मुंबई - ४०० ०३२.
तारीख: ०९ डिसेंबर, २०२१

**संदर्भ :-**

१) **वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांकः अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थसंकल्प-३, दिनांक ०६ एप्रिल, २०२१**
२) **वित्त विभागाचा शासन निर्णय क्रमांकः अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थसंकल्प-३, दिनांक २४ जून, २०२१**
३) **वित्त विभागाचा शासन निर्णय क्रमांकः अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थसंकल्प-३, दिनांक १४ ऑक्टोबर, २०२१**
४) **शासन ज्ञापन क्र.देशियो-२०२१/प्र.क.१४७/शिक्षण-१, दि.३०.११.२०२१**

**प्रस्तावना -**

वित्त विभागाकडून अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS) प्राप्त झालेल्या अनुदानाचा निधी नियंत्रक अधिकारी ( आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे ) यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

सन २०२१-२०२२ या आर्थिक वर्षातील सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागासाठी अर्थसंकल्पित झालेला व वित्त विभागाकडून BEAMS प्रणालीवर प्राप्त झालेला निधी पुढीलप्रमाणे नियंत्रक अधिकाऱ्यांच्या अधिनस्त ठेवण्यासाठी मान्यता देण्यात येत आहे.

**(रुपये लाखात)**

| अ.क्र. | लेखाशिर्ष | नियंत्रक अधिकारी | वितरीत अनुदान |
|---|---|---|---|
| | **मागणी क्रमांक एन-३, २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण** | | |
| १ | २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, ०१ अनुसूचित जातींचे कल्याण, २७७ शिक्षण, (०४) शिष्यवृत्या आणि विद्यावेतने. (०४) (२२) उच्च शिक्षणासाठी अनुसूचित जातीच्या विद्यार्थ्यांना राजर्षि शाहू महाराज शिष्यवृत्ती (अ.जा.उ.यो.) (कार्यक्रम), ३४-शिष्यवृत्या/ विद्यावेतने (२२२५३८२३),३४-शिष्यवृत्या/ विद्यावेतने | आयुक्त (समाजकल्याण) महाराष्ट्र राज्य, पुणे | ३००.०० |

२. सन २०२१-२०२२ या आर्थिक वर्षात वित्त विभागाने बीम्स प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेला उपरोक्त निधी / अनुदान खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून वितरीत करण्यात येत आहे :-

१) ज्या उद्देशासाठी निधी / अनुदान मंजूर आहे त्या व्यतिरिक्त इतर उद्देशासाठी खर्च करता येणार नाही. तसेच इतर लेखाशिर्षाकडे वळती करता येणार नाही.

२) सदर खर्चाचा प्रगती अहवाल मासिक निधी विवरणपत्रानुसार नियंत्रक अधिकारी / आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी दरमहा शासनास १० तारखेपर्यंत सादर करावा.

३) अनुदान वितरीत करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिकेमध्ये नमूद केलेल्या नियमांचे पालन करावे. तसेच वित्त विभाग शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र. ३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-१, उपविभाग एक मधील अटी व शर्तीचे पालन करुन सक्षम प्राधिकाऱ्यांची मान्यता घेवून अनुदान अदा करावे.

४) खाजगी स्वंयसेवी संस्थांना अनुदान उपलब्ध करुन देताना वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-१, उपविभाग एक मधील अनुक्रमांक २७, नियम १४९ प्रमाणे सक्षम अधिकाऱ्याची मान्यता घेवून अनुदान अदा करावे.

५) ज्या तरतूदी वितरणासाठी प्रशासकीय मान्यता आदेशाची आवश्यकता आहे अशा तरतूदी वितरीत करताना भाग-१, उपविभाग-तीन, अनुक्रमांक-चार, नियम २७ (२) अन्वये प्रदान केलेल्या अधिकाराप्रमाणे सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने आदेश निर्गमित झाल्यानंतर अनुदान वितरीत करावे.

६) जिल्हा परिषदांसाठीचे वेतनेत्तर अनुदान त्यांचे अनुदान निर्धारण झाल्याशिवाय वितरीत करु नये.

७) नवीन खर्चाच्या अनुषंगाने नवीन बाबीव्दारे तरतूद केलेल्या योजनांच्या निधी वितरणासंदर्भात वित्त विभागाची मान्यता आवश्यक आहे.

८) विविध शासकीय / प्रशासकीय संस्थांना तसेच अनुदानित संस्थांना सहायक अनुदाने मंजूर करण्यापूर्वी त्यांचेकडून पूर्वी वितरीत केलेल्या अनुदानाच्या खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे विभागाने प्राप्त करावीत. शक्यतो यापूर्वी दिलेल्या अनुदानाचा विनियोग पूर्ण झाल्याशिवाय पुढील अनुदान वितरीत करण्यात येऊ नये. कोषागार अधिकाऱ्यांनी, सहायक अनुदानामधून निधी आहरित करण्यासाठी सादर केलेल्या देयकासोबत संबंधित संस्थेचे लगतच्या मागील महिन्यातील बँक अकाऊंट स्टेटमेंट (Bank Account Statement) ची प्रत जोडलेली नसल्यास देयक पारित करु नये.

९) शासनाव्दारे देण्यात येणारे वेतन अनुदान लाभार्थ्यांच्या बँक अकाऊंटमध्ये ECS व्दारे प्रदान करणे बंधनकारक राहील. कोणत्याही परिस्थितीत वेतन अनुदानाची रक्कम एकत्रितरीत्या व Offline पध्दतीने वितरीत करण्यात येऊ नये.

१०) स्थानिक स्वराज्य संस्था तसेच महामंडळे यांना अनुदान वितरीत करण्यापूर्वी सदर संस्थांकडून राज्य शासनास येणे असणाऱ्या रकमांचा आढावा घेण्यात यावा व त्या रकमा वसूल करुनच उर्वरीत अनुदान वितरीत करण्यात यावे. तसेच शासनाव्दारे सदर संस्थांना वितरीत केलेल्या अनुदानाचा विनियोग व अखर्चित रक्कम कुठे ठेवली आहे याबाबतची तपशीलवार माहिती एकत्रित करण्यात यावी. सदर अखर्चित निधी बँकेमध्ये ठेवलेला असल्यास त्याचे बँक अकाऊंट स्टेटमेंट (Bank Account Statement) शासनास सादर करावे. एखाद्या कार्यक्रमावरील खर्चासाठी उपलब्ध करुन देण्यात आलेला

निधी अखर्चित असल्यास त्याच प्रयोजनासाठी चालू वर्षी वित्त विभागाच्या अनुमतीशिवाय निधी वितरीत करु नये.

११) वैयक्तिक लाभार्थ्यांच्या कार्यक्रमाअंतर्गतची लाभार्थ्यांची देयके आहरित करतांना लाभार्थ्यांची यादी निश्चित करुन योग्य त्या तपशिलासह देयकासोबत जोडल्याशिवाय वैयक्तिक लाभार्थ्यांची अनुदाने आहरित करण्यात येऊ नयेत. वैयक्तिक लाभार्थ्यांचे कार्यक्रम आधार क्रमांकाशी संलग्न करण्यात यावीत व अनुदानाचे प्रदान इलेक्ट्रॉनिक्स क्लिअरन्स सिस्टीमनेच (ECS) करण्यात यावे.

१२) शिष्यवृत्ती / शिक्षणशुल्काची प्रतिपूर्ती, वैयक्तिक लाभार्थी तसेच सवलती पोटी दिलेले अनुदान इत्यादीची प्रदाने, इलेक्ट्रॉनिक्स क्लिअरन्स सिस्टीम (ECS) नेच अदा करण्यात यावीत. अशा सर्व बाबी आधार क्रमांकाशी संलग्न करण्यात याव्यात.

१३) बांधकाम विषयक प्रस्तावासंदर्भात प्रशासकीय मान्यता / तांत्रिक मान्यता तसेच आवश्यक तेथे सचिव समितीची मान्यता प्राप्त करुन कामनिहाय निधी अर्थसंकल्पीत करणे आवश्यक आहे. नवीन कामांबाबत निधीच्या उपलब्धतेची खात्री केल्यांनतरच कामाची निविदा सूचना काढून कार्यारंभ आदेश देण्यात येऊन काम सुरु करावे व आवश्यकतेप्रमाणे निधीचे वितरण करण्यात यावे. जुन्या कामांचा आढावा घेऊन ती प्राथम्याने पूर्ण करण्यात यावीत व हा निधी ठेव बांधकामाचे स्वरुपात सार्वजनिक बांधकाम विभागास प्रदान करु नये.

१४) केंद्र पुरस्कृत योजनेसंदर्भात केंद्र शासनाकडून निधी प्राप्त झाल्याची खात्री संबंधित विभागाने नस्त्यावर वित्त विभागाच्या अर्थोपाय शाखेकडून करुन घ्यावी (यासाठी व्यय / अर्थसंकल्प शाखेला नस्ती संदर्भीत करण्याची आवश्यकता नाही ) व तदनंतर सदर निधी प्राप्त झाला असल्यास तसेच राज्य शासनाचा समरुप हिस्सा प्रशासकीय विभागाने त्यांचे स्तरावर वितरीत करावा. यासाठी नस्ती पुन्हा वित्त विभागास सहमतीसाठी वेगळयाने संदर्भीत करण्याची आवश्यक नाही. मात्र, मागील वर्षामधील केंद्र शासनाचा निधी चालू वर्षी खर्च करावयाचा असल्यास त्यास आवश्यकतेप्रमाणे यथास्थिती नियोजन, आदिवासी विकास विभाग व सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग तसेच वित्त विभागाची सहमती घेणे अनिवार्य राहील.

१५) "शासकीय विभागाने करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची नियमपुस्तिका", उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने त्यांच्या क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दि. १.१२.२०१६ च्या शासन निर्णयान्वये प्रसिध्द केली आहे. सदर शासन निर्णय व त्यासोबतच्या मार्गदर्शक सूचनाप्रमाणे तसेच दि. २४ ऑगस्ट, २०१७ व दि. ८ डिसेंबर, २०१७ च्या शासन निर्णयातील तरतूदींनुसार खरेदीप्रक्रीया पूर्ण करुन पुरवठादार निश्चित झाल्याशिवाय तसेच या मार्गदर्शक सूचनेतील अटींचे पालन करुन खरेदीची देयके कोषागारातून आहरित करण्यात यावीत. खरेदीविषयक धनादेश संबंधित पुरवठादाराच्याच नावाने व शक्यतो इलेक्ट्रॉनिक्स क्लिअरन्स सिस्टीमव्दारे (ECS) अदा करण्यात यावेत.

१६) अनेक वेळेला विभागांव्दारे संक्षिप्त देयकाव्दारे निधी खर्च करण्यात येतो. मात्र त्याचे तपशीलवार देयक सादर न केल्यामुळे लेखा आक्षेप येतात व अपहार संभवतात. तरी यापुढे विभागांनी ज्या लेखाशीर्षाखाली जुनी तपशीलवार देयके प्रलंबित असतील ती सादर केल्याशिवाय त्या लेखाशिर्षाखालील निधी वित्त विभागाच्या सहमतीशिवाय आहरित करु नये.

१७) विविध कारणांमुळे अखर्चित राहिलेला निधी विभागांनी त्यांच्या अधिनस्त महामंडळाकडे हस्तांतरीत करुन तांत्रिकदृष्टया खर्च झाल्याचे दाखविले जाते, ही एक प्रकारची अनियमितता आहे, याची विभागांनी नोंद घ्यावी. तसेच त्यांच्या अधिनस्त असलेला यापूर्वीचा अखर्चित निधी (स्वीय प्रपंजी खात्यातील / महामंडळाच्या खात्यातील वा इतर प्रकारे खर्च दर्शवून बाहेर ठेवण्यात आलेला) संपूर्णत: खर्च झाल्याशिवाय तरतुदी आहरीत वा वितरीत करु नयेत. याठिकाणी असेही निदर्शनास आणण्यात येते की, स्वीय प्रपंजी लेख्याखाली विभागांकडे बऱ्यांच मोठया प्रमाणावर निधी अखर्चित असल्याचे दिसून येते. सदर निधीचा ताळमेळ घालून व लेखा परिक्षण करुन निधी विहीत मुदतीत खर्च न झाल्यास तो शासनाच्या तिजोरीत परत करण्यात यावा. सदर अखर्चित निधी बँकेमध्ये ठेवलेला असल्यास त्याचे बँक अकाऊंट (Bank Account Statement) शासनास सादर करावे.

१८) थकित देयकांच्या प्रदानासाठी खर्च करण्यात येणाऱ्या प्रकरणी खरेदी केलेले साहित्य प्रत्यक्ष प्राप्त झाल्याचे व त्याचे लेखे सुयोग्यरित्या ठेवल्याची खात्री पटल्याशिवाय तो निधी आहरित करण्यात येऊ नये.

३. सदर शासन निर्णय अर्थसंकल्प नियम पुस्तिका नियम १७ व नियम १४२, तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मधील उपविभाग-एक नियम क्र. १४९ आणि वित्त विभागाचा शासन निर्णय/परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थसंकल्प-३, दिनांक ०६ एप्रिल, २०२१ व दिनांक २४ जून, २०२१ तसेच वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.९४७/व्यय-१४, दिनांक.२८.१०.२०२१ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२१०११५८१७१४२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prashant Pundlik Wagh

Digitally signed by Prashant Pundlik Wagh
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice & Special Assist Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=759e87fbd1e68c290a7221620636ede8425d6a870aa0240f18d726b6c8e6b832, serialNumber=5599270e38b296e5e5d814ff5976561a3ec66d875aeb425d735e1d7c12140929, cn=Prashant Pundlik Wagh
Date: 2021.12.10 11:58:36 +05'30'

( प्रशान्त पुं. वाघ )

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव
२. मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
३. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४. मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा / विधानपरिषद, मुंबई
५. मा. उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६. मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७. मा. विधानसभा, विधानपरिषद व संसद सदस्य
८. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
९. मा. उपमुख्यमंत्र्यांचे सचिव
१०. मा. मंत्री (सामाजिक न्याय व विशेष सहाय्य) यांचे स्वीय सहायक
११. मा. राज्यमंत्री (सामाजिक न्याय/ विशेष सहाय्य) यांचे स्वीय सहायक

१२. अप्पर मुख्य सचिव (सामाजिक न्याय व विशेष) यांचे स्वीय सहायक
१३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र - १ / २, मुंबई / नागपूर
१४. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र - १ / २, मुंबई / नागपूर
१५. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१७. स्थानिक निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१८. वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे
१९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२०. आयुक्त (समाजकल्याण), महाराष्ट्र राज्य, पुणे
२१. सहसचिव / उपसचिव (शिक्षण-२), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
२२. वित्त विभाग (व्यय-१४ / अर्थसंकल्प - ७) मंत्रालय, मुंबई
२३. कक्ष अधिकारी (शिक्षण-२), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
२४. निवड नस्ती, कार्यासन अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.